**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे** कोठारी, **ता .जि .**अकोला **नळ पाणीपुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०२३/प्र.क्र.०८ /पापु-१९**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: २३ फेब्रुवारी,२०२३

वाचा

१) शासन निर्णय क्रमांक: मुपेयो २०१७/ प्र.क्र. २०४/ पापु- १९, दिनांक १४.०२.२०१८
२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अकोला यांचे सुधारित तांत्रिक मान्यता आदेश क्रमांक जिप/ग्रापापुवि/तांशा-२/तांमा/२४६/२०२३, दि.०७/०२/२०२३
३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, अकोला यांचे क्रमांक जिपअ/ग्रापापुवि/भानिका/लेखा/२१९/२०२३,दि ०२/०२/२०२३
४) वित्त विभाग शासन निणर्य क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७ एप्रिल,२०१५

**प्रस्तावना:-**

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे कोठारी, ता. जि. अकोला येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.५१.९६ लक्ष इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र. १ येथील आदेशान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. तथापि, सदर योजनेच्या प्रत्यक्ष कामादरम्यान काही तांत्रिक बदल करणे आवश्यक असल्याने योजनेच्या किंमतीत वाढ झाली आहे. त्यामुळे कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अकोला यांनी संदर्भाधीन क्र. ३ च्या पत्रान्वये रु. ५९.०८ लक्ष (ढोबळ) इतक्या किंमतीचे सुधारित अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे. सदर सुधारित अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अकोला यांनी संदर्भाधीन क्र. २ अन्वये सुधारित तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे कोठारी, ता. जि. अकोला येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या कामातील तांत्रिक बदलास मान्यता देऊन, योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मौजे कोठारी, ता. जि. अकोला येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या कामातील तांत्रिक बदलास मान्यता देऊन, रु. ५९.०८ लक्ष (अक्षरी रुपये एकोनसाठ लाख आठ हजार फ़क्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पुढील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) सदर योजना जिल्हा परिषदेमार्फ़त कार्यान्वित करण्यात येईल.

२) सदर योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या आदेशातील व तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

३) मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणीपुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी वीजदेयके न भरल्यामुळे बंद पडल्या असल्याचे दिसून येते. त्यामुळे सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्यासाठी पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी.

५) योजनेची चाचणी घेतल्यानंतर योजना संबंधित ग्रामपंचायतीकडे हस्तांतरित करुन लेखे बंद करण्यात यावेत.

६) योजना राबविणे त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/ जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान मिळणार नाही.

७) योजना पुर्नसुधारित होणार नाही, याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

८) हागणदारी मुक्तीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

९) जीएसटी रक्कम कंत्राटदारास अदा करण्याबाबत शासन निर्णय दि. १५ फेब्रुवारी, २०२१ प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

**२. या योजनेच्या सुधारित किंमतीतील वाढीव खर्च रु.७.१२ लक्ष (अक्षरी रु. सात लाख बारा हजार फक्त) हा मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(२६) मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम (२२१५ ९९४२)- ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/ २०१३/विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२३११४२३१२७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHANDRAKANT KRISHNA MORE

Digitally signed by CHANDRAKANT KRISHNA MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=11ac200219edb36f7777ee1101657bea427109026722812 2b638d6f2cdedad62,
pseudonym=268C7E15F99BF8B492638E14751A661EBCF0233F,
serialNumber=2314CF333E070F9936792BC95890FA89B2F617A93 1B2B577B703FA858F3DF433, cn=CHANDRAKANT KRISHNA MORE
Date: 2023.02.23 14:02:24 +05'30'

**(चं. कृ.मोरे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३) मा. उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधान परिषद
६) मा. विधानमंडळ सदस्य/संसद सदस्य (सर्व)
७) मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता), मंत्रालय, मुंबई.यांचे खाजगी सचिव.
८) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
९) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,अकोला.
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती
१२) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, अमरावती
१३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई
१४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
१५) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद अकोला
१६) निवड नस्ती (पापु-१९)